पुणे येथील प्रादेशिक रेशीम कार्यालय व जिल्हा रेशीम कार्यालयाच्या इमारतींची दुरुस्ती, नुतनीकरण व अनुषंगिक कामे करण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

### शासन निर्णय क्रमांक :- सपववि-४००२१/१/२०२४-DESKSERICULTURE-CMTD

नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- ३१ मार्च, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : प्रावियो-१०१८/प्र.क्र.४५/रेशीम कक्ष, दि.०३.०५.२०१८

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९

३) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४.०३.२०२४

७) संचालक (रेशीम) यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्र. रेशीम/कार्या-८/पा.भु.सुविधा/इमारत नुतनिकरण-दुरुस्ती/ २०२३-२४/३६९, दि.१३.०३.२०२४.

८) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-८/पा.भु.सुविधा/इमारत नुतनिकरण-दुरुस्ती/ २०२३-२४/४१९, दि.१८.०३.२०२४.

प्रस्तावना :-

राज्यातील रेशीम उद्योगाच्या विस्तार व विकासासाठी रेशीम संचालनालयातंर्गत प्रादेशिक रेशीम कार्यालय व जिल्हा रेशीम कार्यालय यांच्यामार्फत कामकाज करण्यात येते. पुणे येथील रेशीम कार्यालयाच्या इमारती फारच जुन्या झाल्यामुळे इमारतींची दुरूस्ती, नुतनीकरण व अनुषंगिक कामे करणे आवश्यक असल्याने संचालक (रेशीम) यांनी संदर्भाधीन दि.१३.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. संचालक (रेशीम) यांनी दि.१८.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सदर कामकाजाकरिता निधी उपलब्ध करून देण्याची विनंती यांनी केली आहे. रेशीम विकास कार्यक्रमांतर्गत पायाभूत सुविधा निर्माण करणे व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण योजनेसाठी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता सुधारीत अंदाजानुसार ₹ १४७०.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पित तरतूद मंजूर करण्यात आली आहे. त्यानुसार पुणे येथील प्रादेशिक रेशीम कार्यालय व जिल्हा रेशीम कार्यालयाच्या इमारतीची दुरूस्ती, नुतनीकरण व

अनुषंगिक कामे करण्यासाठी ₹९०.६३ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची विनंती वित्त विभागास केली होती. त्यास अनुसरुन उक्त योजनेंतर्गत सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत उक्त निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सबब, पुणे येथील प्रादेशिक व जिल्हा रेशीम कार्यालयाच्या इमारतीची दुरूस्ती व अनुषंगिक कामे करण्यासाठी संचालक (रेशीम) यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रेशीम संचालनालयांतर्गत पुणे येथील प्रादेशिक रेशीम कार्यालय व जिल्हा रेशीम कार्यालय इमारतीची दुरुस्ती, नुतनीकरण व अनुषंगिक कामे करण्यासाठी रेशीम विकास कार्यक्रमांर्गत पायाभूत सुविधा निर्माण व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण योजनेंतर्गत ₹९०,६३,०००/- (अक्षरी रुपये नव्वद लक्ष त्रेसष्ठ हजार फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त निधी हा ज्या कामांसाठी उपलब्ध करून दिला आहे त्याच कामांवर व प्रशासकीय मान्यतेच्या रकमेच्या मर्यादेत खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदर कामकाज विहीत मुदतीत करण्याची कार्यवाही सर्व संबधित यंत्रणानी घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाने तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहीत मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. राज्यात लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २०२४ करीता दि.१६.०३.२०२४ पासून आचार संहिता लागू करण्यात आली आहे. सदर आदर्श आचार संहितेचा भंग होणार नाही, याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी.

५. उक्त खर्च हा "मागणी क्र. व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१) (०२) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम विकास कार्यक्रमांतर्गत पायाभूत सुविधा निर्माण करणे व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण (कार्यक्रम) (२८५१६५८३), ३३, अर्थसहाय्य" अंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V0003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाने अनौ.संदर्भ क्र. ३११/२०२४ दिनांक ३०.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११२१०४६८८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRADDHA DEVEN KOCHAREKAR

Digitally signed by SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC51883E2B27843640CD6C07C96E3E8715CC5BFBE554420E4D68E5F4B112388A, cn=SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
Date: 2024.03.31 13:31:59 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (इमारत) विभाग, पुणे.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, पुणे.
११) रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१, जिल्हा रेशीम कार्यालय, पुणे.
१२) निवड नस्ती (रेशीम कक्ष).